प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र- एससीपी-२०११/(२४६/२०११)/मशि-१
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई.
दिनांक - २८ सप्टेंबर,२०११

**शासन निर्णय :-** वरिष्ठ जिल्हा न्यायाधिश संवर्गातील श्री.आर.बी.मलिक, अध्यक्ष, औद्योगिक न्यायालय, मुंबई यांची प्राचार्य, शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई या पदावर खालील अटी व शर्तीवर तात्पुरत्या स्वरुपात दि.२८/०९/२०१२ पर्यंत म्हणजे ते नियतवयोमानानुसार सेवानिवृत्त होईपर्यंत किंवा महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होईपर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत प्रतिनियुक्तीने मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या शिफारशीनुसार नियुक्ती करण्यात येत आहे.

१) प्राचार्य पदाची वेतनश्रेणी रु.३७४००-६७०००/- एजीपी रु. १००००/- अशी असली तरी श्री.मलिक यांना पद्मनाभन आयोगाच्या शिफारशीनुसार त्यांना सध्या लागू असलेली वेतनश्रेणी लागू राहील व सध्या घेत असलेले वेतन व भत्ते संरक्षित करण्यात येत आहे.
२) सदर वेतनश्रेणी व्यतिरिक्त केंद्र शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता व स्थानिक पुरक भत्ता अनुज्ञेय राहील.
३) श्री.मलिक यांना शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.एससीटी-२००९/प्र.क्र.१४०/का-तीन, दि.२२.१०.२०१० अन्वये मंजूर भत्ते / सुविधा अनुज्ञेय राहतील.
४) श्री.मलिक यांचे महाराष्ट्र न्यायिक सेवा (सुधारणा) नियम-२०११ मधील तरतूदीनुसार सेवानिवृत्तीचे वय ६० राहील.
५) श्री.मलिक यांना मंजूर करण्यात आलेल्या शासकीय निवासस्थानाचा ताबा त्यांच्याकडे पुढे पण कायम ठेवण्यास सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे.
६) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग दि.२२.१०.२०१० नुसार त्यांना अनुज्ञेय असलेल्या सुविधेनुसार एक विशेष बाब म्हणून त्यांना स्वतंत्र वाहन उच्च व तंत्र विभागाकडून पुरविण्यात येईल.

२. हे आदेश प्राप्त होताच श्री.मलिक यांनी प्राचार्य, शासकीय विधी महाविद्यालय या पदाचा कार्यभार तात्काळ स्वीकारावा व त्याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत शासनास सादर करावा.

...२..

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashatra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०९२८१८२५४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

र.बा.मयेकर

( र.बा.मयेकर )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई.

प्राचार्य, शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई.

श्री.आर.बी.मलिक, अध्यक्ष, औद्योगिक न्यायालय, मुंबई.

रजिस्टर जनरल, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.

डॉ.मंजुषा मोळवणे, प्रभारी प्राचार्य, शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), १, मुंबई.

खाजगी सचिव, मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.

खाजगी सविव, राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग), मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.

प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक.

निवडनस्ती.